**श्री. गोपालकृष्ण रामचंद्र पडोळे, स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक यांची सेवा समाप्त करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांक: नियुक्ती-२०२४/प्र.क्र.४१७/सेवा-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २५ एप्रिल, २०२५

**संदर्भ :**

१. सा.बां.वि. शासन आदेश क्र. पदभ-२०२४/प्र.क्र.८१(१)/सेवा-३, दि. ०७.०३.२०२४
२. मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.विभाग, नागपूर यांचे आदेश क्र. कार्या आस्था-२/३३/२०२४, दि. ११.०३.२०२४
३. कार्यकारी अभियता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. ३, नागपूर यांचे पत्र जा.क्र. ०३/आस्था-०२/२०२४, दि. २६.०३.२०२४ रोजीचे पत्र.
४. उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन), नागपूर यांचे क्र. डेस्क-१७/तलाठी / पुनर्वसन / कावि-७९३/२०२४, दि. ०६.०९.२०२४ रोजीचे आदेश
५. मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, नागपूर यांचे पत्र जा.क्र. कार्या आस्था-२ / ७२१२/२०२४, दि. ३.१०.२०२४

**प्रस्तावना -**

सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत सरळसेवा पदभरती सन २०२३ मध्ये राबविण्यात आली होती. सदर भरती प्रक्रियेतून श्री. गोपालकृष्ण रामचंद्र पडोळे यांची खुला-प्रकल्पग्रस्त या प्रवर्गातून संदर्भाधीन क्र. १ येथील दि. ०७.०३.२०२४ रोजीच्या आदेशान्वये सा.बां. प्रा. विभाग, नागपूर कार्यालयात करण्यात आली होती. मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, नागपूर यांनी संदर्भाधीन क्र. २ येथील दि. ११.०३.२०२४ रोजीच्या आदेशान्वये सदर उमेदवाराची सविस्तर पदस्थापना सा.बां.मंडळ, नागपूर अंतर्गत सा.बां. उपविभाग कुही कार्यालयात करण्यात आली. श्री. पडोळे यांचे प्रकल्पग्रस्त प्रमाणपत्र सत्यता पडताळणीकरिता उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन) कार्यालय, नागपूर यांना, कार्यकारी अभियंता, सा.बां. विभाग क्र. ३, नागपूर यांच्या संदर्भाधीन क्र. ३ येथील दि. २६.०३.२०२४ रोजीच्या पत्रान्वये सादर करण्यात आले. उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन) कार्यालय, नागपूर यांनी संदर्भाधीन क्र. ४ येथील दि. ०६.०९.२०२४ रोजीच्या पत्रान्वये कार्यकारी अभियंता, सा.बां. विभाग क्र. ३, नागपूर यांना, "श्री. माधो सदाशिव पडोळे हे मूळ प्रकल्पग्रस्त असून त्यांना गोसीखुर्द प्रकल्पांतर्गत प्रकल्पग्रस्त व्यक्ती म्हणून नोकरी ऐवजी एकमुस्त अनुदान रू. २.९० लक्ष देण्यात आले होते. महसूल व वन विभाग, शासन निर्णय दि. १८.०६.२०१३ अनुसार एकमुस्त अनुदान म्हणून रू. २.९० लक्ष रक्कम स्वीकारलेल्या बाधित कुटुंबास किंवा त्यातील सदस्यांना प्रकल्पग्रस्त प्रमाणपत्राच्या आधारे नोकरीविषयक लाभ अनुज्ञेय ठरत नाहीत. त्यामुळे श्री. पडोळे यांच्या प्रकल्पग्रस्त प्रमाणपत्राची वैधता मान्य करता येणार नाही" असे कळविले. उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन) कार्यालय, नागपूर यांच्या दि. ०६.०९.२०२४ रोजीच्या अहवालाविरूद्ध श्री. पडोळे यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर खंडपीठ येथे मूळ अर्ज क्र. ९७७/२०२४ दाखल केला आहे. सदर मूळ अर्ज प्रकरणी मा. न्यायाधिकरणाने अद्यापपर्यंत कुठलाही स्थगिती आदेश दिलेला नाही. श्री. गोपालकृष्ण रामचंद्र पडोळे, स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक यांचे प्रकरणी उचित कार्यवाही करण्यासाठी मुख्य अभियंता, सा.बां.प्रा. विभाग, नागपूर यांनी संदर्भ क्र. ५ च्या पत्रान्वये शासनास कळविले आहे. या

सर्व पार्श्वभूमीच्या अनुषंगाने श्री. पडोळे यांची प्रकल्पग्रस्त प्रवर्गातून केलेली निवड अवैध ठरत असल्याने त्यांची नियुक्ती रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश** :-

श्री. गोपालकृष्ण रामचंद्र पडोळे, स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक यांचे प्रकल्पग्रस्त प्रमाणपत्र उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन), नागपूर यांनी संदर्भाधीन क्र. ४ येथील दि. ०६.०९.२०२४ रोजीच्या आदेशान्वये रद्द केले आहे. त्यामुळे संदर्भाधीन क्र. १ येथील दि. ०७.०३.२०२४ रोजीच्या शासन आदेशातील श्री. गोपालकृष्ण रामचंद्र पडोळे (अ.क्र. ७५, गुणवत्ता क्र. ५८८) यांची स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक या पदावरील नियुक्ती याद्वारे रद्द करण्यात येत असून या आदेशाच्या दिनांकापासून त्यांच्या सेवा संपुष्टात आणण्यात येत आहेत.

सदर आदेश महसूल व वन विभागाच्या अनौ. सं. क्र.२६/र-१, दि. १२.११.२०२४ ला अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४२५१७५२३८७५१८ आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

POOJA BHASKAR UDAWANT

Digitally signed by POOJA BHASKAR UDAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=3a216aeb67842b82e08ea38ee54173f5a527cd40299fd7cb135e0abc12d5ab49, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C0BDDEC9E386D4BD1D8C49113A8F429650B2609DEA0BDA6E1ED8FD55A0D6A5FD, cn=POOJA BHASKAR UDAWANT
Date: 2025.04.25 17:53:34 +05'30'

**( पुजा भा. उदावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. महालेखापाल २, लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा महाराष्ट्र, नागपूर
४. अपर मुख्य सचिव (सा.बां.वि.), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई
५. सचिव (बांधकामे/रस्ते), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर
७. अधीक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर
८. सह सचिव (सेवा/संनि),सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
१०. कार्यासन अधिकारी [आस्थापना-१/आस्थापना-३/सेवा-२], सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. श्री. गोपालकृष्ण रामचंद्र पडोळे यांना मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचेमार्फत
१२. निवडनस्ती, सेवा-३